**Convertion in Regular Temparary Establishment:- Shri.Nandkumar A.Muni & Other 6, working under Superintending Engineer, Bid Irrigation Project Circle, Bid**

**कार्यव्ययी व रोजंदारी आस्थापनेवरील पदाचे अस्थायी आस्थापनेवरील पदामध्ये रुपांतरण अधिक्षक अभियंता,बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ, बीड - सर्वश्री. नंदकुमार मुनी व इतर ६ मजूर**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग,

शासन निर्णय क्रमांक : रुअआ-२०११/(८३/२०११)/आ (कामगार )

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांकः- १०.०६.२०११

पहावेः-:१) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रः- रु.अ.आ- १५९६/२२८/ सेवा- ५,दिनांक २४.४.२००१.

२) कार्यकारी अभियंता,लातूर लघु पाटबंधारे विभाग,यांचे पत्र क्रःआस्था-३/१२९६/सहपत्र, दिनांक- ०९.०४.२०११.

**प्रस्तावना** :-

सर्वश्री.नंदकुमार अण्णाचार्य मुनी व इतर ६ कामगारांना सन १९८६ मध्ये कार्यकारी अभियंता, लातूर पाटबंधारे विभाग, लातूर अंतर्गत कामाच्या आवश्यकतेनुसार रोजंदारी आस्थापनेवर कामावर घेण्यात आले होते. त्यांच्या सेवेची आवश्यकता संपल्यामुळे सदर कामगारांना कामावरुन कमी करण्यात आले. सदर कामगारांनी त्यांना पूर्ववत कामावर घेण्यासाठी मा.कामगार न्यायालय, लातूर येथे दावा क्रमांक ७३/१९८७ दाखल केला.सदर दाव्यावर दिनांक २८.६.९० रोजी न्यायनिर्णय होवून सर्वश्री.नंदकुमार अण्णाचार्य मुनी व इतर ६ कामगारांना न्यायनिर्णयापासून तीस दिवसाच्या आत सेवा सातत्य व मागील वेतनासह कामावर घेण्याबाबत आदेश दिले. मा.कामगार न्यायालय, लातूर यांच्या निर्णयाविरुध्द विभागातर्फे मा.औद्योगिक न्यायालय, सोलापूर येथे दाखल केलेली रिव्हिजन याचिका क्रमांक १३/९०, दिनांक ८.६.९५ च्या आदेशान्वये फेटाळण्यात आली.त्यानंतर मा.कामगार न्यायालय, लातूर यांच्या उपरोक्त दिनांक २८.६.९० च्या निर्णयानुसार क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी सर्वश्री.मुनी व इतर ६ कामगारांना सन ९५ व ९६ पासून सेवेत पुनर्स्थापित केले.सदर कार्यवाहीस क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी शासनाची मान्यता घेतल्याचे दिसून येत नाही. मा.औद्योगिक न्यायालय,सोलापूर यांच्या दिनांक ८.६.९५ च्या आदेशाविरुध्द मा.उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद येथे रिट पिटीशन क्रमांक ३९१२/९५ दाखल करण्यात आली. सदर प्रकरणी दिनांक १२.१२.९७ रोजी सुनावणी होवून काही कार्यालयीन आक्षेपांचे विहीत मुदतीत (सहा आठवडे) निराकरण करण्यात यावे, अन्यथा याचिका फेटाळली जाईल, असे आदेश देण्यात आले. तथापि सदर आक्षेपांचे निराकरण न झाल्यामुळे सदर रिट पिटीशन दिनांक १२.१२.१९९७ रोजी खारीज केली. सर्वश्री.मुनी व इतर ६ कामगारांनी त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेऊन वेतनाची थकबाकी मिळणेकरिता मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद, येथे दावा क्रमांक ६१८/२००३ दाखल केला. सर्वश्री.मुनी व इतर कामगार हे अद्याप रोजंदारी आस्थापनेवर कार्यरत असून रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आलेले नाहीत. त्यामुळे उपरोक्त दावा मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या अधिकार कक्षेत येत नसल्याचे न्यायालयाच्या निदर्शनास आणण्यात आले.सदर दाव्याचा निकाल दिनांक ३०.३.२०११ रोजी झाला असून सर्वश्री.मुनी व इतर ६ कामगारांना दिनांक ०१.०२.१९९१ पासून रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेऊन कालेलकर करारानुसार थकबाकी सहीत सर्व फायदे देण्याबाबत निर्णय झाला. यासंदर्भात महामंडळाचे वकील यांचे अभिप्राय घेतले असता कालेलकर करारानुसार तसेच शासन निर्णय दिनांक २४.०४.२००१ मधील अटींची पूर्तता करीत असल्यामुळे महाराष्ट प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या आदेशानुसार संबंधित कामगारांना रूपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत त्यानी अभिप्राय दिले. त्याचप्रमाणे मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणासमोर शासनाच्या वतीने बाजू मांडलेले सादरकर्ता अधिकारी यांनी देखील सदर

कामगार हे २४.०४.२००१ मधील शासन निर्णयातील अटींची पूर्तता करीत असल्यामुळे दिनांक ३०.०३.२०११ च्या निर्णयाविरूध्द मा. उच्च न्यायालयामध्ये आव्हान देणे अडचणीचे ठरणार आहे,म्हणून शासन निर्णयानुसार रूपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावे असे अभिप्राय दिल. संबंधित कामगारांनी कपात कालावधीच्या काळातील सर्व थकबाकी सोडण्याबाबत हमीपत्र दिलेले आहे. मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद यांच्या निकालानुसार सर्वश्री.मुनी व इतर ६ कामगारांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय:-</u>**

अधिक्षक अभियंता,बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ,अंतर्गत सर्वश्री. नंदकुमार मुनी व इतर ६ मजूर,यांना मा. उच्च न्यायालयाच्या रिट पिटिशन क्रमांक३९१२/१९९५ मधील सिव्हिल अर्ज क्रमांक१४६२/२००३ अन्वये सादर केलेल्या याचिका पुनर्जिवित झाल्यानंतर दाखल केलेल्या याचिकेवरील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून त्यांच्या नावांसमोर दर्शविल्याप्रमाणे त्यांनी धारण केलेले तत्सम पद खालीलप्रमाणे अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यात येत आहे.

| अ क्र. | कर्मचा-याचे नांव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणावयाचा दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | श्री. नंदकुमार मुनी | रोजंदारी | ०८/०१/१९८६ | ०१/०२/१९९१ | मुकादम | रु. ७७५-११५० (जूनी) रु. २६१०-४००० (५ वा वेतन आयोग) |
| २. | श्री.धनराज लिंगप्पा जिवणे | रोजंदारी | ०२/०२/१९८६ | ०१/०२/१९९१ | मुकादम | रु. ७७५-११५० (जूनी) रु. २६१०-४००० (५ वा वेतन आयोग) |
| ३. | श्री.रामकृष्ण लक्ष्मण धुमाळ | रोजंदारी | ०८/०१/१९८६ | ०१/०२/१९९१ | मजुर | रु. ७५०-९४० (जूनी) रु. २५५०-३२०० (५ वा वेतन आयोग) |
| ४. | श्री.भालचंद भानुदास शिंदे | रोजंदारी | ०८/०१/१९८६ | ०१/०२/१९९१ | मजुर | रु. ७५०-९४० (जूनी) रु. २५५०-३२०० (५ वा वेतन आयोग) |
| ५. | श्री.योगीनाथ काशीनाथ सावळगे | रोजंदारी | ०८/०१/१९८६ | ०१/०२/१९९१ | मजुर | रु. ७५०-९४० (जूनी) रु. २५५०-३२०० (५ वा वेतन आयोग) |
| ६. | श्री.उध्दव गणपतराव जाधव | रोजंदारी | ०८/०१/१९८६ | ०१/०२/१९९१ | मजुर | रु. ७५०-९४० (जूनी) रु. २५५०-३२०० (५ वा वेतन आयोग) |
| ७. | श्री.विष्णू अप्पाराव जाधव | रोजंदारी | २१/०१/१९८६ | ०१/०२/१९९१ | मजुर | रु. ७५०-९४० (जूनी) रु. २५५०-३२०० (५ वा वेतन आयोग) |

३.        सर्वश्री. नंदकुमार मुनी व इतर ६ मजूर,यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत केलेल्या पदाकरीता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान / कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचा-यांच्या बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यात येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशीव्यतिरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यात येत आहे.

४.        अधिक्षक अभियंता, बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ, बीड यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत, याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत निर्गमित करून ते संबंधित कर्मचा-याच्या निदर्शनास आणावेत. तपशीलामध्ये संबंधित कर्मचा-यांचे नांव, पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक किंवा त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे, तो दिनांक,इत्यादी बाबी नमूद कराव्यात.त्यामध्ये कोणतीही चूक अथवा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिका-याने अशी बाब तात्काळ शासनाच्या निदर्शनास आणावी. क्षेत्रिय अधिका-याने सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करू नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचा-यांच्या व्यक्तिशः निदर्शनास आणून शासनाने निर्गमित केलेल्या आदेशाच्या बाबतीत संबंधित कर्मचा-याची (नांव, पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक किंवा त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याचा दिनांकात दुरूस्ती इत्यादी बाबी) कोणतीही तक्रार नसल्यास त्यांच्याकडून तशा आशयाचे प्रपत्र "ब"मधील दिलेल्या नमुन्यात हमीपत्र (Undertaking )घेऊन ते त्या कर्मचा-याच्या सेवापटात / सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत शासनाला सादर केला जाईल, याबाबत संबंधित अधीक्षक अभियंत्यानी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत / त्रुटी असल्याची संबंधित कर्मचा-याची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरूपात घेण्यात यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरूस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत शासनास सादर केला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरूस्ती प्रस्ताव पाठविताना संबंधित कर्मचा-याच्या नेमणूकांच्या आदेशांच्या प्रती, नाममात्र हजेरीपटाच्या प्रती आणि सेवापट पाठविण्याची दक्षता घ्यावी.

५.        सर्वश्री. नंदकुमार मुनी व इतर ६ मजूर यानी कपातीच्या कालावधीतील सर्व थकबाकी शासनास सोडून देण्याचे हमीपत्र दिले असल्याने सदर थकबाकी त्यांना देय होणार नाही. मात्र त्यांना प्रत्यक्ष कामावर रुजू झाल्यापासून म्हणजेच सन १९९६ पासून त्यांना अनुज्ञेय असलेली वेतनातील थकबाकीच्या फरकाची रक्कम संबंधित कर्मचा-यांस रोखीने द्यावयाची असून ती धनादेशाद्वारे (Cheque ) अदा करण्यात यावी. तसेच सर्वश्री. नंदकुमार मुनी व इतर ६ मजूर , यांची वेतननिश्चिती त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी.

६.        हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. रूअआ- १५९६/२२८/सेवा -५, दिनांक २४.०४.२००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून काढण्यात येत आहे.

७.        हा शासन निर्णय www.maharastra.gov.in हया संकेत स्थळावर २०११०६१०१६४०४८००१ हया सांकेतांक क्रमांकावर प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

अ.अ.कोदे

**( अ.अ.कोदे )**
**शासनाचे उप सचिव**

प्रत  सहपत्रासहित अग्रेषित :-
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई/ महाराष्ट्र -२ नागपूर
महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई/ महाराष्ट्र -२ नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी,  बीड
वित्त विभाग, (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई-४०००३२
अधिक्षक अभियंता, बीड पाटबंधारे प्रकल्प मंडळ, बीड
कार्यकारी अभियंता,लातूर लघु पाटबंधारे विभाग,
निवडनस्ती /आस्थापना (कामगार ) संग्रहार्थ